लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्या कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.:- एलपीएल २०२०/प्र.क्र. २०/पंधरा**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक:-२८ फेब्रुवारी, २०२०.**

वाचा - १. शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र. एलपीएल १००१/प्र.क्र.११३/२००१/१५,दि. १६.०८.२००३.
२. शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र. एलपीएल १०९८/प्र.क्र.६५/९९/१५, दि.०८.०६.२००५.
३. शासन निर्णय, सा.प्र.वि .क्र. एलपीएल २०१९/प्र.क्र.८९/१५,दि. ११.१०.२०१९
४. शासन निर्णय,वि.वि. क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.१२.०२.२०२०

## शासन निर्णय

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एलपीएल २०१९/प्र.क्र.८९/१५, दि.११.१०.२०१९ अन्वये लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयातील १७ अस्थायी पदांना दिनांक २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.आता खालील विवरणातील सदर १७ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० या सहा महिन्यांच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

**अस्थायी पदांचे विवरण**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | पदनिर्मितीच्या आदेशाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १ | सहायक प्रबंधक | १(एक) | शा.नि.सा.प्र.वि.क्र.एलपीएल १०९५/प्र.क्र.५९/९५/१५, दि. २१.०८.१९९६ |
| २. | कक्ष अधिकारी | १(एक) | शा.नि.सा.प्र.वि.क्र.एलपीएल १०९५/प्र.क्र.५९/९५/१५, दि. २१.०८.१९९६ |
| ३ | लघुलेखक (उच्चश्रेणी) | १(एक) | शा.नि.सा.प्र.वि.क्र.एलपीएल ११८६/१९९५/११, दि. ०१.०९.१९९० |
| ४ | अनुवादक (मराठी) | १(एक) | शा.नि.सा.प्र.वि.क्र.एलपीएल १०९५/प्र.क्र.५९/९५/१५, दि. २१.०८.१९९६ |
| ५ | सहायक | ३(तीन) | शा.नि.सा.प्र.वि.क्र.एलपीएल ११८६ /११८५ / प्र. क्र. २९ /८७/ ११, दि.०७.०८.१९९२.<br>शा.नि.सा.प्र.वि.क्र. एलपीएल १०९५ / प्र.क्र.५९ / ९५/ का.१५, दि.०७.०८.१९९२. |
| ६ | लिपिक | ३(तीन) | शा.नि.सा.प्र.वि.क्र.एलपीएल १०९५/प्र.क्र.५९/९५/१५, दि. २१.०८.१९९६ |
| ७ | लघुटंकलेखक | १(एक) | शा.नि.सा.प्र.वि.क्र.एलपीएल १०७३/८९२५/(अ)डी-१, दि. २५.०५.१९७३ |
| ८ | टंकलेखक | १ (एक) | शा.नि.सा.प्र.वि.क्र.एलपीएल १०९५/प्र.क्र.५९/९५/१५, दि. २१.०८.१९९६ |

| | | | |
|---|---|---|---|
| ९ | लिपिक टंकलेखक | १ (एक) | शा.नि.सा.प्र.वि.क्र.एलपीएल११८६/११८५/प्र.क्र.२९/८७/११,दि. ०७.०८.१९९२ |
| १० | वाहनचालक | १ (एक) | शा.नि.सा.प्र.वि.क्र.एलपीएल ११८६/११८५/ प्र.क्र.२९/८७/११,दि. ०७.०८.१९९२ |
| ११ | चोपदार | १ (एक) | शा. नि. सा. प्र. वि. क्र. एलपीएल १०७३ /८९२५ अ (डी)-१, दि. २४.०५.१९७३ |
| १२ | शिपाई | २ (दोन) | शा.नि.सा. प्र. वि. क्र. एलपीएल १०९१/१३५/३५/९१/११, दि. ०२.०८.१९९१.<br>शा.नि.सा.प्र.वि.क्र.एलपीएल१०९५/प्र.क्र.५९/९५/का.१५, दि. २१.०८.१९९६ |
| **एकूण १७ ( सतरा )पदे** | | | |

२. लोक आयुक्त कार्यालयाच्या सुधारित आकृतीबंधाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.त्यात शिपाई संवर्गातील ३ पदे निरसित करण्यात येणार आहेत. त्यामुळे आकृतीबंधाचा शासन निर्णय निर्गमित होण्याच्या अधीन राहून तुर्त या १७ पदांस दि.३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च "मागणी क्रमांक ए-४-सामान्य प्रशासन विभाग-२०७०-इतर प्रशासनिक सेवा-१०४-दक्षता (००)(००)(०१) लोक आयुक्त (२०७० ००८५)"या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२०-२१ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे आदेश वित्त विभागाच्या,शासन निर्णय क्र.पदनि २०१६/ प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना देण्यात आलेल्या अधिकारास अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२७१६४०२३८१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Gupte Sanju Kamlakar

Digitally signed by Gupte Sanju Kamlakar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2834863d93dd5ba34736e8845b6287c3dd58ee176cf2b893df4e169e70699c59, serialNumber=4c10e808fe85223e03be4cad0148cef9a71914878680c586fc438e7239dafca4, cn=Gupte Sanju Kamlakar
Date: 2020.02.28 16:01:11 +05'30'

**( सं.क.गुप्ते )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,(दोन प्रती)
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई,
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
६. वित्त विभाग, व्यय -४, अर्थसंकल्प - १९,आ.पु.क, मंत्रालय, मुंबई,
७. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन - २५ (दोन प्रती),
८. निवड नस्ती.